# महाराष्ट्र शासन

**क्रमांकः बीयुडी-१६२३/प्र.क्र.२१०/२८-अ (विमान-१)**
**सामान्य प्रशासन विभाग, मादाम कामा मार्ग,**
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक ३०.०३.२०२४

**विषय-** मिहान प्रकल्पाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत

**वाचा** - १. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२. सामान्य प्रशासन विभागाचे समक्रमांकाची ज्ञापने दि.०२.०६ २०२३, दि.२५.०९.२०२३ व दि.२६.०२.२०२४
३. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र. मविविकं/२०२४/वित्त व लेखा/६४७४, दि.२०.३.२०२४
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२४/प्र.क्र.३८/अर्थसंकल्प-३, दिनांक २० मार्च,२०२४.

**शासन ज्ञापन-**

मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२.५% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जौयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व कलम २८ खालील दाव्यांसाठी लेखाशीर्ष ३०५३०१७३ खाली ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता निधी उपलब्ध करून देण्यात येतो. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपरोक्त लेखाशीर्ष अंतर्गत रु.२६०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे. वित्त विभागाने मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मिहान प्रकल्पासाठी लेखाशीर्ष ३०५३०१७३ खाली आतापर्यंत रु.१३०.०० कोटी (रूपये एकशे तीस कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बिम्स प्रणाली) वितरीत केला आहे.

२. उपरोक्त लेखाशिर्षातर्गत नियोजन विभाग व वित्त विभागाने रु.५२.०० कोटी (रुपये बावन्न कोटी फक्त ) इतका निधी वितरित करण्यास सशर्त मान्यता देण्यात आली आहे. सदरहू निधी मिहान प्रकल्पासाठी खालील तक्यातील स्तंभ क. ३ मधील लेखाशिर्षाखाली स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांना खालील अटींच्या पूर्तता करण्यात येईल या अटींच्या अधीन राहून वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) मागणी केलेला निधी ज्या कारणासाठी मागितला आहे, त्याच कारणासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

२) निधी वितरीत करतांना विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्याची व सदर निधी दि.३१ मार्च,२०२४ अखेरपर्यंत खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

३) वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक २०/३/२०२४ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात येईल.

(रु.कोटीमध्ये)

| अ.क्र. | बाब | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ मध्ये अर्थसंकल्पित तरतूद | सन २०२३-२४ मध्ये यापूर्वी वितरित निधी | या शासन ज्ञापनान्वये वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १(अ) | कलम- १८ खालील देय रकमा दिवाणी न्यायालयातील वाढीव नुकसान भरपाई बाबतचे दाखल दावे १८ कलम ( मिहान प्रकल्प ) | ३०५३ ०१७३ | रु.२६०.०० | रु.१३०.०० | रु.१८.०० |
| १(ब) | | | | | रु.१८.०० |
| २(अ) | कलम-अंतर्गत प्राप्त २८ अर्जान्वये निवाडा पारीत केलेल्या | | | | रु.५.५० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | प्रकरणात देय वाढीव मोबदला अदा करण्याकरिता | | | | |
| २(ब) | | | | | रु.५.५० |
| ३ | मिहानप्रकल्पांतर्गत चिंचभुवन व खापरी येथील पर्यायी (रेल्वे) गावठाणातील नागरी सुविधांच्या बांधकामाकरिता स्थापत्य विभागाद्वारे प्राप्त मागणीनुसार | | | | रु.५.०० |
| | **एकूण** | | | | **रु.५२.००** |

३. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक ए०७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमान १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

बिम्स प्रणालीवर निधी वितरणासाठी सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालक,मंत्रालय, मुंबई ( A००३६ ) हे नियंत्रक अधिकारी म्हणून नमूद करण्यात आले आहेत. सबब,सदर निधी बिम्स प्रणालीवर सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन),मंत्रालय, मुंबई यांना वितरित करण्यात यावा. संचालनालय स्तरावर देयके अदा करण्यासाठी संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकास कामासाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि. ३१ मार्च २०२४ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातून खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच, खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ मधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ २२८/का-१४४३, दिनांक २६.३.२०२४ आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ २५४६/व्यय-४, दिनांक ३०/३/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२४०३३०२०३०२५४३०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJASHREE S HIRLEKAR

Digitally signed by RAJASHREE S HIRLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a2696592d5d84825b5aed6905fd0b9e9dd2c6726eb5ebc44e78c6af282fc9b0d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9182EA9A54D76E6216129AD842EA023F173D8083DBD47F2CF1041DA3010B16D6, cn=RAJASHREE S HIRLEKAR
Date: 2024.03.31 14:53:04 +05'30'

**( राजश्री हिर्लेकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई

२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई

३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय- ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्य.२८-अ)